**आगामी सन २०१०-११ चे ग्रामीण भागातील दारिद्रय रेषेखालील कुटुंबांचे सर्वेक्षण सुरळीतपणे पार पाडण्यासाठी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्र.दारेग-२०१०/प्र.क्र.९४/योजना-१
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - ३० नोव्हेंबर, २०१०

**वाचा** :- अवर सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या स्वाक्षरीचे शासन परिपत्रक क्र.विकाक-२००९/प्र.क्र.२९२/प्राशि-१, दिनांक १० मे, २०१०

**प्रस्तावना :-**

ग्रामीण भागातील दारिद्रय रेषेखालील कुटुंबांचे सर्वेक्षण केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार या विभागाच्या अखत्यारीत पार पाडले जाते. हे राष्ट्रीय स्तरावरील महत्वाचे काम असून सर्वेक्षणासाठी मोठया प्रमाणावर कर्मचारीवृंदाची आवश्यकता पडते. सन २०१०-११ मध्ये हाती घ्यावयाच्या आगामी ग्रामीण भागातील दारिद्रय रेषेखालील कुटुंबांच्या सर्वेक्षणासाठी केंद्र शासनाकडून लवकरच सूचना अपेक्षित आहे. मागील सर्वेक्षणांचा अनुभव विचारात घेता सन २००२-०७ कालावधीच्या सर्वेक्षणाचे वेळी काही शासकीय व जिल्हा परिषद कर्मचारी संघटनांनी या कामावर बहिष्कार टाकल्याने सुशिक्षित बेरोजगार व इतर कर्मचा-यांच्या मदतीने सर्वेक्षण पूर्ण करण्यात आले.

२. जिल्हा परिषदांतर्गत प्राथमिक शिक्षकांची संख्या मोठया प्रमाणावर आहे व त्यांचा सर्वेक्षणासाठी चांगल्या प्रकारे उपयोग होवू शकतो. तसेच त्यांना संबंधित कुटुंबांची माहितीसुध्दा असते. परंतु सन १९९७ च्या सर्वेक्षणाचे वेळी महाराष्ट्र राज्य प्राथमिक शिक्षण संघ, पनवेल, मुंबई यांनी मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्र.६१५८/१९९७ दाखल केली होती. या याचिकेची नुकतीच दखल घेवून मा.उच्च न्यायालयाने शिक्षकांच्या सेवा दारिद्रय रेषेखालील कुटुंबांच्या सर्वेक्षणासाठी न वापरणेबाबत दि.२३.३.२०१० रोजी निर्णय दिला आहे. याचबरोबर केंद्र शासनाने प्राथमिक शिक्षणाचा मूलभूत अधिकारामध्ये समावेश करणारा Right of children to free and compulsory Education Act, २००९ हा दि.१.४.२०१० पासून संपूर्ण भारतात (जम्मू व काश्मीर वगळता) लागू केला असून संदर्भाधीन दि.१० मे, २०१० च्या शासन परिपत्रकान्वये तो राज्यात प्रसुत करण्यात आला आहे. या अधिनियमाच्या कलम २७ नुसार शिक्षकांच्या सेवा जनगणना, लोकसभा/विधानसभा निवडणूका किंवा स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणूका तसेच नैसर्गिक आपत्ती निवारणार्थ करावयाची कामे याव्यतिरिक्त इतर

कोणत्याही अशैक्षणिक कामांसाठी वापरता येणार नाहीत. या बाबी विचारात घेता, दारिद्रय रेषेखालील कुटुंबांच्या सर्वेक्षणासाठी शिक्षकांच्या सेवा उपलब्ध होवू शकणार नाहीत. सन २०१०-११ पासून हाती घ्यावयाचे ग्रामीण भागातील दारिद्रय रेषेखालील कुटुंबांचे सर्वेक्षण सुरळीतपणे पार पडावे व त्यात त्रुटी राहू नयेत यासाठी शासनाच्या इतर यंत्रणांकडून सहकार्य मिळणे आवश्यक आहे. यासाठी शासनाच्या इतर विभागातील ग्रामीण तालुका व जिल्हा स्तरावरील अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवा उपयोगात आणणे अत्यावश्यक झालेले आहे.

**<u>शासन निर्णय</u>**

ग्रामीण भागातील दारिद्रय रेषेखालील कुटुंबांचे सर्वेक्षण केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार अधिकाधिक बिनचूक व सुरळीतपणे पार पाडण्यासाठी तसेच आगामी सन २०१०-११ चे सर्वेक्षण लवकरच सुरु होण्याचे अपेक्षित असल्याने सदरची बाब विचारात घेऊन या कामासाठी प्रत्येक जिल्हयात संबंधित जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय समिती गठीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १) जिल्हाधिकारी | - | अध्यक्ष |
| २) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. | - | सदस्य |
| ३) पोलीस अधिक्षक | - | सदस्य |
| ४) जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था | - | सदस्य |
| ५) अधिक्षक, कृषी अधिकारी | - | सदस्य |
| ६) प्रकल्प संचालक, जि.ग्रा.वि.यं. | - | सदस्य सचिव |

वर नमूद केलेल्या अधिका-यांव्यतिरिक्त इतर कोणत्या विभागाच्या जिल्हास्तरीय अधिका-यांचा समावेश करणे आवश्यक आहे असे वाटल्यास जिल्हाधिकारी अशा अधिका-यांचा या समितीत आमंत्रित म्हणून समावेश करु शकतील.

दारिद्रय रेषेखालील कुटुंबांच्या याद्या सर्वच विकास कामे पाहणा-या विभागांना त्यांच्या योजनांसाठी वापरणे बंधनकारक असल्याने सर्वेक्षणाची संपूर्ण जबाबदारी जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या या समितीकडे राहील. दारिद्रय रेषेखालील कुटुंबांचे सर्वेक्षण करण्यासाठी कोणत्याही विभागाच्या कोणत्याही अधिकारी/कर्मचारी यांच्या सेवा (शिक्षक कर्मचारी सोडून) उपलब्ध करुन घेण्याचे अधिकार समितीस असतील. त्यानुसार पुरेश्या संख्येने अधिकारी/कर्मचारी यांची उपलब्धता करुन घेवून आगामी दारिद्रय रेषेखालील कुटुंबांचे सर्वेक्षण काटेकोरपणे पार पाडण्यात यावे. जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखालील समितीमार्फत केलेल्या कामाचा आढावा संबंधित विभागीय आयुक्त वेळचे वेळी घेतील व सर्वेक्षण विभागीय आयुक्त यांच्या नियंत्रणाखाली पार पाडले जाईल.

हा शासन निर्णय महसूल व वन विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०१०११२९१८३९५५००१ असा आहे.

(सुधीर ठाकरे)
**सचिव, ग्राम विकास विभाग**

**प्रति,**

मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य,
मा.मंत्री, ग्राम विकास
मा.राज्यमंत्री, ग्राम विकासमा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
विभागीय आयुक्त (सर्व)
जिल्हाधिकारी (सर्व)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
जिल्हा नियोजन अधिकारी (सर्व)
सर्व उप विभागीय अधिकारी तथा तहसिलदार (जिल्हाधिकारी यांचे मार्फत)
निवडनस्ती.